**वित्तिय वर्ष २०१९-२० करीता वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेस एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमकरिता ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) व ३६-सहायक अनुदाने ( वेतन ) या बाबीखाली माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर,२०१९ करीता अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे ( बिम्स ) अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१९/प्र.क्र.१५/सीपीटीपी-ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१९.

वाचा :- १) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १२ जुलै,२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं - २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै,२०१९.
३) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्रमांक बियुडी २०१९/प्र.क्र.९६/२०१९/२५, दिनांक ०९ जुलै, २०१९.
४) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्रमांक जा.क्र. वनामती /सीपीटीपी / वेतन - वेतनेतर / कॅश फ्लो / लेखा-४/३११०, दिनांक १५.१०.२०१९ व पत्र क्रमांक वनामती /सीपीटीपी / वेतन - वेतनेतर / कॅश फ्लो /३२४४, दिनांक २५.१०.२०१९

**प्रस्तावना** :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २०.०१.२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.त्यानुसार सन २०१९-२० या आर्थिक वर्षात माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर,२०१९ करीता एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम- ५ व ६ अंतर्गत वसंतराव नाईक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर यांना प्रशिक्षणासाठी तसेच वेतनासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** : -

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा ३६-सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली ६४,४९,०००/- तसेच ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली ६,९३,००,०००/- इतकी अशा प्रकारे एकूण ७,५७,४९,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील शासन परिपत्रकानुसार तसेच कार्यासन २५ च्या संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील शासन परिपत्रकानुसार एकूण रुपये ७,५७,४९,०००/- इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६०% म्हणजेच रु.४,५४,४९,४००/- इतकी रक्कम प्रथम नऊमाहिकरीता ( डिसेंबर २०१९ अखेर ) अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे ( बिम्स ) वितरीत करणे आवश्यक आहे.

२. सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरीता माहे एप्रिल ते जुलै,२०१९ या कालावधीसाठी लेखाशिर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा ३६-सहायक अनुदान ( वेतन ) या उद्दीष्टाखाली रु.२४,००,०००/- ( अक्षरी रुपये चोवीस लाख फक्त ) तसेच ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रु.१६,१७,०००/- ( अक्षरी रुपये सोळा लाख सतरा हजार फक्त ) असे एकूण रु.४०,१७,०००/- ( अक्षरी रुपये चाळीस लक्ष सतरा हजार फक्त ) इतके अनुदान वसंतराव नाईक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर प्रशिक्षण संस्थेस संदर्भाधीन

अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे ( बिम्स ) वितरीत केलेले आहे.

३. आता संदर्भाधीन अनुक्रमांक २ व ३ नुसार ६०% च्या मर्यादेते उर्वरीत रु.४,१४,३२,४००/- ( अक्षरी रुपये चार कोटी चौदा लक्ष बत्तीस हजार चारशे फक्त ) इतके अनुदान माहे ऑगस्ट,२०१९ ते माहे डिसेंबर, २०१९ करीता दरमहा रु. ८२,८६,४८०/- ( अक्षरी रुपये ब्याऐंशी लक्ष शहाऐंशी हजार चारशे ऐंशी फक्त ) प्रमाणे अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे ( बिम्स ) वितरीत करणे आवश्यक आहे. तथापि, संचालक, वनामती यांनी ३६-सहायक अनुदान ( वेतन ) या उद्दीष्टाखाली रु.४१,५०,०००/- ( अक्षरी रुपये एक्केचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त ) तसेच सीपीटीपी ४ अ, सीपीटीपी ५ व सीपीटीपी ६ च्या १९४ प्रशिक्षणार्थींच्या प्रशिक्षण खर्चासाठी ३१-सहायक अनुदान ( वेतनेतर ) या उद्दीष्टाखाली रु.६,८३,४०,०००/- ( अक्षरी रुपये सहा कोटी त्र्याऐंशी लक्ष चाळीस हजार फक्त ) असे एकूण रु.७,२४,९०,०००/-( अक्षरी रुपये सात कोटी चोवीस लक्ष नव्वद हजार फक्त ) इतके अनुदानाची मागणी माहे ऑगस्ट,२०१९ ते माहे डिसेंबर, २०१९ करीता संदर्भाधीन अनुक्रमांक ४ येथील पत्रांन्वये केलेली आहे.

४. उपरोक्त “परिच्छेद १” विचारात घेता लेखाशिर्ष २०७०-इतर प्रशासनिक सेवा ३६-सहायक अनुदान ( वेतन ) या उद्दीष्टाखाली रु.१४,६९,४००/- ( अक्षरी रुपये चौदा लक्ष एकोणसत्त्तर हजार चारशे फक्त ) तसेच ३१-सहायक अनुदान ( वेतनेतर ) या उद्दीष्टाखाली रु.३,९९,६३,०००/- ( अक्षरी रुपये तीन कोटी नव्यान्नव लक्ष त्रेसष्ट हजार फक्त ) अशा प्रकारे एकूण रु.४,१४,३२,४००/- ( अक्षरी रुपये चार कोटी चौदा लक्ष बत्तीस हजार चारशे फक्त ) इतके अनुदान माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर, २०१९ करीता दरमहा रु. ८२,८६,४८०/- ( अक्षरी रुपये ब्याऐंशी लक्ष शहाऐंशी हजार चारशे ऐंशी फक्त ) प्रमाणे एकूण अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे ( बिम्स ) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर प्रशिक्षण संस्थेस पुढील अटी व व शर्तींच्या अधीन राहून वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **तपशिल** | **माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर,२०१९ करीता वितरित केलेले अनुदान** |
|---|---|
| ३६-सहायक अनुदाने (वेतन ) | रुपये १४,६९,४००/- |
| ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर ) | रुपये ३,९९,६३,०००/- |
| एकूण रुपये | रुपये ४,१४,३२,४००/- |

अ) संचालक वनामती, नागपूर या संस्थेने खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम कोषागारातून आहरीत करण्याची दक्षता घ्यावी.

आ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरीत केल्यानंतर आहरीत केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीषार्खाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करून घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसाच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE), महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

५. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर यांना राहतील व त्याकरीता वनामती त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१११६१५२६०८२५०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2019.11.16 15:28:38 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था वनामती, नागपूर ( ३ जादा प्रतींसह),
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-३ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन क्रमांक २५ ) मंत्रालय मुंबई-३२.
११. निवड नस्ती कार्यासन सीपीटीपी-ब.

-----